१. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे
२. डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती.
या संस्थांना सन २०२१-२२ या वर्षासाठी (अनिवार्य) ३१ सहाय्यक अनुदान ( वेतनेतर ) करिता निधी वितरित करणेबाबत. (अंतिम हप्ता)

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः यशदा २०२१/प्र.क्र.४९/२१/१२ अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च, २०२२

**वाचा :**
१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थसंकल्प ३, दि.६ एप्रिल, २०२१.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०२१/प्र.क्र.८९/२०२१/२५, दि.८ एप्रिल, २०२१.
३. प्राध्यापक तथा वित्तीय सल्लागार यशदा पुणे यांचे क्र.बजेट-२०२१-२२ / न.क्र.११३ /२०२१ दि.२७ ऑगस्ट,२०२१
४. संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी ,अमरावती यांचे क्र.लेखा/३१-सहा-अनुदान/६६९/२०२१ दि.२३.७.२०२१ चे पत्र .
५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थसंकल्प ३, दि.१४ ऑक्टोबर, २०२१.
६. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक यशदा २०२१ /प्रक्र. ४९/२१/१२-अ दि.२० डिसेंबर,२०२१.
७. वित्त विभाग, परिपत्रक क्रमांक. अर्थसं २०२१/प्र.क्र.४८/अर्थसंकल्प ३, दि.२८ जानेवारी २०२२.
८. लेखाधिकारी, यशदा पुणे जा.क्र.बजेट /२०२२-२३/ न.क्र.-११७/२०२२ दि.१६.२.२०२२.
९. संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती यांचे क्र.लेखा शाखा /६६९/२०२१ दि.२३.७.२०२१ चे पत्र.

**शासन निर्णय-**

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी पुणे व डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थांकरिता सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षाच्या अनिवार्य खर्चासाठी संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये ३१ सहायक अनुदान ( वेतनेतर ) करिता अनुक्रमे रु.३९२.०४ लाख व रु.१४.७० लाख इतकी तरतूद करण्यात आली आहे. सन २०२१-२२ या आर्थिक वर्षातील अनिवार्य खर्चाच्या ३१ सहायक अनुदान ( वेतनेतर ) करिता, अर्थसंकल्पीय तरतूदीनुसार संदर्भाधीन क्र. ५ च्या शासन निर्णयान्वये व संदर्भाधीन क्र.७ च्या शासन परिपत्रकान्वये ६० % च्या मर्यादेत खर्च करण्यास मान्यता दिली आहे.

तथापि संदर्भाधीन क्र. ७ च्या शासन निर्णयान्वये मंजूर अर्थसंकल्पिय तरतुदीच्या अनुषंगाने कार्यालयीन खर्चासाठी अनिवार्य (३१ सहायक अनुदान वेतनेतर) करिता १५ % च्या मर्यादेत निधी उपलब्ध करुन दिला होता. त्यानुसार, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी पुणे, व डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थांकरिता संदर्भाधीन क्र.६ च्या शासन निर्णयान्वये अनुक्रमे रु.५८.८० लाख व रु. २.२० लाख इतका निधी वितरित केला आहे.

२. आता, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे, व डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या दोन संस्थांकरिता अनिवार्य ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या लेखाशिर्षाखाली कार्यालयीन खर्चाकरिता सुधारित अंदाजाच्या मर्यादेत वित्त विभागाने अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधीतून यापूर्वी वितरित करण्यात आलेला १५% निधी वजा जाता खालील तक्त्यातील रकाना क्र. ६ मध्ये नमूद निधी वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | राज्य योजनांतर्गत योजना | सन २०२१-२०२२ साठी अनिवार्य खर्चाकरिता मंजूर अर्थसंकल्पिय तरतुद | सन २०२१-२०२२ साठी वित्त विभागाकडून अनिवार्य खर्चाकरिता सुधारित अंदाजाच्या मर्यादेत उपलब्ध होणारा निधी | सन २०२१-२०२२ साठी वित्त विभागाकडून अनिवार्य खर्चाकरिता १५ % मर्यादेत उपलब्ध केल्यानुसार वितरित करण्यात आलेला निधी | सन २०२१-२०२२ साठी वित्त विभागाकडून अनिवार्य खर्चाकरिता यापूर्वी १५ % च्या मर्यादेत वितरित करण्यात आलेला निधी वजा करुन उर्वरित वितरित करण्याचा निधी . |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ४-५=६ |
| | अनिवार्य | ३१ सहायक अनुदान वेतनेतर | ३१ सहायक अनुदान वेतनेतर | ३१ सहायक अनुदान वेतनेतर | ३१ सहायक अनुदान वेतनेतर |
| १ | यशदा, पुणे यांस सहाय्यक अनुदान,अनिवार्य (२०७० ०५३२) | रु.३९२.०४ लाख | रु.२९४.०३ लाख | रु.५८.८० लाख | रु.२३५.२२ लाख |
| ३ | विदर्भ प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस सहायक अनुदान अनिवार्य (२०७० ०७५५) | रु.१४.७० लाख | रु८.८२ लाख | रु.२.२० लाख | रु.६.६२ लाख |

३. आता, **यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे** या संस्थेस सुधारित अंदाजाच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करुन दिलेल्या सहायक अनुदानामधून अनिवार्य खर्चासाठी **रु.२३५.२३ लाख ( रुपये दोन कोटी, पस्तीस लाख, तेवीस हजार फक्त )** इतके ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेतर) ( अंतिम व दुसरा हप्ता ) म्हणून मंजूर करण्यात येत आहे.

हा खर्च मागणी क्र .ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ प्रशिक्षण (००)(०६) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यास सहाय्यक अनुदान (अनिवार्य ) ( २०७००५३२ ) - ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" याखाली **रु२३५..२३ लाख ( रुपये दोन कोटी ,पस्तीस लाख ,तेवीस हजार फक्त( याप्रमाणे** भागविण्यात यावा.

४. **डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी,अमरावती या** संस्थेस सुधारित अंदाजाच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरणासाठी उपलब्ध करुन दिलेल्या सहायक अनुदानामधून अनिवार्य खर्चासाठी **रु.६.६२ लाख ( रुपये सहा लाख, बासष्ट हजार फक्त )** इतके ३१ सहाय्यक अनुदान ( वेतनेतर ) ( अंतिम व दुसरा हप्ता ) म्हणून मंजूर करण्यात येत आहे .

हा खर्च मागणी क्र.ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ प्रशिक्षण (००)(०८) डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती यास सहाय्यक अनुदान ( अनिवार्य ) ( २०७००७५५ ) - ३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) याखाली सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतुदीतून **रु.६.६२ लाख ( रुपये सहा लाख , बासष्ट हजार फक्त ) याप्रमाणे** भागविण्यात यावा.

**५.** सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची तीनही संस्थेने खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

६. दोनही संस्थांनी आर्थिक वर्ष २०२१-२०२२ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सिमित ठेवावा.

७. दोनही संस्थांनी आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशीलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१ व २, मुंबई / नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

८. दोनही संस्थांचे उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र- १ व २, मुंबई / नागपूर २, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१८४/२०२२, व्यय ४ दि.२८.३.२०२२ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**१०.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२९१४५९१६६६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

LEENA ASHISH SANKHE

Digitally signed by LEENA ASHISH SANKHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT,
2.5.4.20=522242e2259dbf8fc1aed336674ebf6138607b16aacbbed00301a9e43c62f6c7, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=783CA3332598C7E1C28393EA543FA05D9FB77F36A848F4738D12288E105699F4, cn=LEENA ASHISH SANKHE
Date: 2022.03.29 15:03:51 +05'30'

**( लिना संखे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति:-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
३) महासंचालक, यशदा पुणे.
४) विभागीय आयुक्त, अमरावती.
५) संचालक, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती
६) उप संचालक, लेखा व कोषागारे, अमरावती
७) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद /अमरावती
८) लेखा अधिकारी, यशदा पुणे
९) उप कोषागार कार्यालय, अमरावती.
१०) वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई
११) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई
१२) मा. अ.मु. स.(सेवा) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
१३) निवड नस्ती. (सामान्य प्रशासन विभाग/कार्या. १२ अ)